कृषि व पदुम विभागाकरिता दोन अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक-कृपवि-२०१९/प्र.क्र. ६३४/प्रशा.१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- २७ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा**- १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २१ डिसेंबर, २०१९.

२) कार्यालयीन आदेश कृषि व पदुम विभाग क्र. कृपवि-२०१९/प्र.क्र. ६३४/प्रशा.१, दि. ३१.१२.२०१९

**प्रस्तावना:-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एससीआय आणि इतर विरूध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर ) यामध्ये दि. ६ जुलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांची रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दि. २८.०९.२०१८ च्या आदेशान्वये माननीय सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि. ३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार मा. उच्च न्यायालयाचे सदर आदेश विचारात घेता मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात योग्य ते आदेश निर्गमित करण्याची बाब या विभागाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २१ डिसेंबर, २०१९ मधील सूचनेनुसार या विभागातील श्री प्रकाश नारायण पाटील, झेरॉक्स ऑपरेटर, श्री नारायण रामा कारभारी शिपाई गट-ड या कर्मचाऱ्याचे अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा कार्यालयीन आदेश क्र. कृपवि-२०१९/प्र.क्र. ६३४/प्रशा.१, दि. ३१.१२.२०१९ अन्वये अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्या आहेत.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि. २१.१२.२०१९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वित्त विभागाने, या विभागातील १ पद झेरॉक्स ऑपरेटर व १ पद शिपाई अशी एकूण २ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता प्रदान केली आहे.

३. त्या अनुषंगाने कृषि व पदुम विभाग मंत्रालय (खुद्द) च्या आस्थापनेवर गट- ड संवर्गामधील १ पद झेरॉक्स ऑपरेटर वेतन श्रेणी (S-३: १६६००-५२४००) व १ पद शिपाई वेतनश्रेणी (S-१: १५०००-४७६००) अशी **एकूण २ अधिसंख्य पदे** ही दि. ३१.१२.२०१९ पासून तात्पुरत्या स्वरूपात ११ महिन्याकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. याद्वारे, निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदावरील खर्च हा या विभागाच्या, मागणी क्र . डी-७, ३४५१, सचिवालय आर्थिक सेवा, (०९०) सचिवालय, ०९० (०१) (०१) कृषि पशुसंर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग (०१) वेतन (योजनेत्तर/दत्तमत) (३४५१०६७२) या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० व सन २०२०-२१ या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २१ डिसेंबर, २०१९ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७/आपुक दि. ०५.०२.२०२० अन्वये, त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२७११२७१८२६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Amol Nilakanth Sakharkar

Digitally signed by Amol Nilakanth Sakharkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=36b60751d094e56d974e1a44ec234c475fb0de5b35a79c1cf69a588f212b260e, serialNumber=bb4888cebbf4b7a6440c6531a52925e3c8140b1c28df723d8f006d11bc169a08, cn=Amol Nilakanth Sakharkar
Date: 2020.02.27 11:42:38 +05'30'

**(अ. नि. साखरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र¬१, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. उप सचिव (प्रशा.) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग/आपुक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
९. रोखशाखा, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. श्री प्रकाश नारायण पाटील, झेरॉक्स ऑपरेटर, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. श्री नारायण रामा कारभारी शिपाई, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवडनस्ती.